श्री. डी. जी. पाटील, शाखा अभियंता, जिल्हा परिषद कोल्हापूर यांच्या जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (पाणी पुरवठा) संवर्गातील कनिष्ठ अभियंत्यांच्या दिनांक १.१.२०१४ रोजीच्या अंतिम ज्येष्ठता सूचीतील आक्षेपाबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठातील रिट याचिका क्र.१५८४/२०१७ प्रकरणी दिनांक ९.३.२०१७ च्या निकालानुसार घ्यावयाच्या निर्णयाबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांकः झेडएनजी-२०१६/प्र.क्र.२०/आस्था-४**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,

फोर्ट, मुंबई - ४०० ००१

तारीखः ०५ मे, २०१७.

संदर्भ -

१) या विभागाचे क्र. झेडएनजी-२०१६/प्र.क्र.२०/आस्था-४, दिनांक ६ एप्रिल, २०१७ रोजीचे श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता यांची सेवा विषयक माहिती मागविण्यासंबंधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना पाठविलेले पत्र.

२) कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा), जिल्हा परिषद कोल्हापूर यांचे जा.क्र.जिपको.ग्रापापुवि.आस्था.कावि.४.वशि.२६५/१७, दिनांक ११ एप्रिल, २०१७ चे श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता यांच्या सेवा पुस्तकातील नोंदीवरुन पडताळणी केलेली जन्मतारीख, प्रथम नियुक्ती दिनांक आणि जिल्हा परिषद कोल्हापूर येथे बदलीने हजर झालेल्या दिनांकाबाबतची सेवाविषयक माहिती सादर करण्यासंबंधीचे ईमेलद्वारे प्राप्त पत्र.

३) कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा), जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी ईमेलद्वारे सादर केलेल्या जा.क्र.जिपको.ग्रापापुवि.आस्था.कावि.४.वशि.२६५/१७, दिनांक ११ एप्रिल, २०१७ च्या पत्रासोबत सादर केलेले श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता यांच्या सेवा पुस्तकाच्या प्रथम पृष्ठाची झेरॉक्स प्रत.

४) कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा), जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी ईमेलद्वारे सादर केलेल्या जा.क्र.जिपको.ग्रापापुवि.आस्था.कावि.४.वशि.२६५/१७, दिनांक ११ एप्रिल, २०१७ च्या पत्रासोबत सादर केलेले श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता यांच्या जिल्हा परिषद, ठाणे अंतर्गत पंचायत समिती वाडा येथे दिनांक १२ डिसेंबर, १९८४ रोजी सेवेत

प्रथमतः रुजू झाल्याबाबतची नोंद असलेल्या व गट विकास अधिकारी, पंचायत समिती वाडा यांची स्वाक्षरी असलेली सेवा पुस्तकाच्या पृष्ठाची झेरॉक्स प्रत.

५) कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा), जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी ईमेलद्वारे सादर केलेल्या जा.क्र.जिपको.ग्रापापुवि.आस्था.कावि.४.वशि.२६५/१७, दिनांक ११ एप्रिल, २०१७ च्या पत्रासोबत सादर केलेले श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांच्या क्र.ठाजिप/पाट/१७०४, दिनांक १७ डिसेंबर, १९८९ च्या आदेशानुसार पंचायत समिती वाडा येथून जिल्हा परिषद कोल्हापूर येथे बदलीने हजर होण्यासाठी दिनांक ३१ डिसेंबर, १९८९ रोजी मध्यान्हपूर्व कार्यमुक्त केल्याबाबत नोंद असलेल्या व गट विकास अधिकारी, पंचायत समिती वाडा यांची स्वाक्षरी असलेली सेवा पुस्तकाच्या पृष्ठाची झेरॉक्स प्रत.

६) कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा), जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी ईमेलद्वारे सादर केलेल्या जा.क्र.जिपको.ग्रापापुवि.आस्था.कावि.४.वशि.२६५/१७, दिनांक ११ एप्रिल, २०१७ च्या पत्रासोबत सादर केलेले श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता यांना जिल्हा परिषद कोल्हापूर अंतर्गत एम. आय.सब डिव्हीजन क्र.५ भुदरगड येथे बदलीने दिनांक १ जानेवारी, १९९० रोजी मध्यान्हपूर्व हजर करुन घेतल्याबाबत नोंद असलेल्या व उप अभियंता, एम. आय.सब डिव्हीजन क्र.५ भुदरगड यांची स्वाक्षरी असलेली सेवा पुस्तकाच्या पृष्ठाची झेरॉक्स प्रत.

७) रिट याचिका क्र.१५८४/२०१७ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे दिनांक ९ मार्च, २०१७ रोजीचे आदेश.

८) शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडएनजी-१००९/प्र.क्र.१२१/आस्था-४, दिनांक २ जुलै, २००९ अन्वये प्रसिद्ध केलेली जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३(पाणी पुरवठा) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंत्यांची दिनांक १.१.२००१ ते दिनांक १.१.२००४ पर्यंतची अंतिम ज्येष्ठता सूची.

९) शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडएनजी-१०१०/प्र.क्र.१३९/आस्था-४, दिनांक १ ऑक्टोबर, २०११ अन्वये प्रसिद्ध केलेली जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३(पाणी पुरवठा) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंत्यांची दिनांक १.१.२००९ रोजीची अंतिम ज्येष्ठता सूची.

१०) शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडएनजी-२०१४/प्र.क्र.६६/आस्था-४, दिनांक १० फेब्रुवारी, २०१५ अन्वये प्रसिद्ध केलेली जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३(पाणी पुरवठा) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंत्यांची दिनांक १.१.२०१४ रोजीची अंतिम ज्येष्ठता सूची.

११) शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडएनजी-२०१६/प्र.क्र.२०/आस्था-४, दिनांक २ मार्च, २०१७ अन्वये प्रसिद्ध केलेली जिल्हा तांत्रिक

सेवा, वर्ग-३(पाणी पुरवठा) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंत्यांची दिनांक १.१.२०१५ पर्यंतची अंतिम ज्येष्ठता सूची.

१२) या विभागाचे क्रमांक : डीईएनजी/३७१६/प्र.क्र.२७/आस्था-४, दिनांक १९ एप्रिल, २०१७ रोजीचे श्री. दशरथ गंगाराम पाटील यांना त्यांचे जन्म प्रमाणपत्र, शाळा सोडल्याचा दाखला, जन्मतारखेत बदल करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे यांना सादर केलेल्या निवेदनाची प्रत, कोल्हापूर जिल्हा परिषदेत बदली मिळण्यासाठी केलेल्या अर्जाची प्रत, इत्यादी माहिती दिनांक २७ एप्रिल, २०१७ रोजीपर्यंत सादर करण्यासंबंधी अवगत करणारे पत्र.

१३) श्री. दशरथ गंगाराम पाटील यांचे दिनांक २६ एप्रिल, २०१७ रोजीचे दिनांक २७ एप्रिल, २०१७ रोजी ईमेलद्वारे प्राप्त झालेले पत्र व त्यासोबत त्यांनी सादर केलेले ग्राम पंचायत मौजे चिमणे, ता. आजरा, जि. कोल्हापूर यांचा जन्मासंबंधी जन्मनोंद रजिस्टरला नोंद नसल्याचे नमूद असलेला दाखला, कनिष्ठ महाविद्यालय सोडल्याचा दाखला, कोल्हापूर जिल्हा परिषदेत बदली मिळण्यासाठी केलेल्या अर्जाची प्रत, आधार कार्ड व पॅन कार्डची प्रत इत्यादी माहिती सादर केल्याबाबतचे पत्र.

**शासन आदेश -**

१) ज्याअर्थी, संदर्भाधीन क्र.७ येथील दिनांक ९ मार्च, २०१७ च्या आदेशान्वये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.१५८४/२०१७ श्री. दशरथ गंगाराम पाटील विरुद्ध महाराष्ट्र शासन या प्रकरणी श्री. पाटील यांची सदर याचिका त्यासोबतच्या सर्व सहपत्रांसह श्री. पाटील यांचे ज्येष्ठता सूची विरोधातील निवेदन असल्याचे मानून सदर निवेदन सदर आदेश प्राप्त झाल्यापासून ८ आठवड्यात निकाली काढण्यासंबंधी आदेश दिलेले आहेत.

२) आणि ज्याअर्थी, कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी क्र.कोजिप/ग्रापापुवि/आस्था-४/३५४/२०१६, दिनांक १३ जुलै, २०१६ अन्वये श्री. डी. जी. पाटील, शाखा अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग क्र.८ शिरोळ यांचा शासनाच्या दिनांक १० फेब्रुवारी, २०१५ च्या ज्येष्ठता यादीतील दुरुस्तीबाबतचा प्रस्ताव या विभागास सादर केला होता.

३) आणि ज्याअर्थी, या विभागाच्या समक्रमांकाच्या दिनांक ४.१.२०१७ च्या पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना श्री. डी.जी. पाटील, शाखा अभियंता यांचे बाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत कळविण्यात आले होते.

४) आणि ज्याअर्थी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांच्या कडून श्री. डी. जी. पाटील यांच्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला नसल्याने या विभागाच्या समक्रमांकाच्या दिनांक २ मार्च, २०१७ च्या शासन परिपत्रकान्वये जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, गट क(पाणी पुरवठा)

संवर्गातील कनिष्ठ अभियंता यांची दिनांक १ जानेवारी, २०१५ रोजीची अंतिम ज्येष्ठता सूची श्री. डी.जी.पाटील यांच्याबाबत कोणतीही दुरुस्ती न होता निर्गमित करण्यात आली होती.

५) आणि ज्याअर्थी, जिल्हा परिषद कोल्हापूर यांच्याकडे दुरध्वनीवरुन वारंवार संपर्क केल्यानंतर कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी दिनांक ११ एप्रिल, २०१७ च्या ईमेलद्वारे पाठविलेल्या पत्रात श्री. डी. जी. पाटील, शाखा अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग क्र.८ शिरोळ यांच्या सेवा पुस्तकात नमूद असलेली श्री. डी. जी. पाटील यांच्यासंबंधीची अनुक्रमे जन्मतारीख-२९ ऑगस्ट, १९६३, प्रथम नियुक्ती दिनांक-१२ डिसेंबर, १९८४, जिल्हा परिषद कोल्हापूरकडे बदलीने हजर झालेला दिनांक-१ जानेवारी, १९९० आणि जि. प. कोल्हापूरकडे बदलीचे कारण-श्री. पाटील यांच्या जिल्हा बदलीच्या आदेशाची प्रत मिळून येत नसल्याने बदलीचे कारण समजून येत नाही अशा स्वरुपाची माहीती कळविलेली होती. तसेच सदर पत्रासोबत श्री. पाटील यांच्या सेवा पुस्तकातील प्रथम पृष्ठाची झेरॉक्स प्रत जोडली असून ज्यामध्ये श्री. पाटील यांची जन्म तारीख दिनांक २९ ऑगस्ट, १९६३ अशी नमूद असल्याचे व सदर जन्म तारीख शाळा सोडल्याच्या दाखल्यावरून तपासली असल्याचे नमूद करण्यात आलेले होते. सदर नोंदीसंदर्भात गट विकास अधिकारी पंचायत समिती वाडा, जि.ठाणे यांनी स्वाक्षरी केलेली असून सदर सेवा पुस्तकाच्या प्रथम पृष्ठावर श्री. दशरथ गंगाराम पाटील यांचीही स्वाक्षरी असल्याचे दिसते. तसेच श्री. पाटील यांच्या दिनांक १२ डिसेंबर, १९८४ रोजी जिल्हा परिषद ठाणे अंतर्गत पंचायत समिती वाडा येथे सेवेत प्रथम हजर झाल्याचे नमूद असलेले सेवा पुस्तकातील संबंधित पृष्ठाची झेरॉक्स प्रत. तसेच श्री. पाटील यांना पंचायत समिती वाडा येथून दिनांक ३१ डिसेंबर, १९८९ रोजी कार्यमुक्त करण्यात येत असल्याची नोंद असलेले सेवा पुस्तकातील संबंधित पृष्ठाची झेरॉक्स प्रत. तसेच श्री. पाटील यांना दिनांक १ जानेवारी, १९९० रोजी लघु पाटबंधारे उप विभाग क्र.५ भुदरगड येथे हजर करून घेतले असल्याची नोंद असलेल्या सेवा पुस्तकाच्या संबंधित पृष्ठाची झेरॉक्स प्रत सादर केली होती.

६) आणि ज्याअर्थी, संदर्भ क्र.१२ येथे नमूद या विभागाच्या क्र. डीईएनजी/३६१७/प्र.क्र.२७/आस्था-४, दिनांक १९ एप्रिल, २०१७ अन्वये श्री. दशरथ गंगाराम पाटील यांना त्यांच्या प्रकरणात निर्णय घेण्यासाठी नस्तीमध्ये उपलब्ध कागदपत्रे पुरेशी नसल्याचे नमूद करुन त्यांचे जन्म प्रमाणपत्र, शाळा सोडल्याच्या दाखल्याची प्रमाणित प्रत, जन्मतारखेत बदल करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे यांना निवेदन सादर केले असल्यास त्याची प्रत, कोल्हापूर जिल्हा परिषदेत बदली व्हावी म्हणून केलेल्या अर्जाची प्रत, बदली आदेशाची प्रत आणि आधार कार्ड व पॅन कार्ड याची प्रमाणित प्रत सादर करण्याबाबत कळविले होते.

७) आणि ज्याअर्थी, संदर्भाधीन क्र.१३ येथील दिनांक २६ एप्रिल, २०१७ च्या पत्रान्वये श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता यांनी ग्राम पंचायत मौजे जिमणे यांचे प्रमाणपत्र, कनिष्ठ महाविद्यालय सोडल्याचा दाखला, कोल्हापूर येथे बदली व्हावी यासाठी केलेल्या अर्जाची प्रत, आधार कार्ड व पॅन कार्डची प्रत ईमेल द्वारे दिनांक २७ एप्रिल, २०१७ रोजी सादर केली आहे. ग्राम पंचायत मौजे

चिमणे, ता. आजरा, जि. कोल्हापूर च्या ग्राम सेवकाने दिलेल्या दिनांक २५ एप्रिल, २०१७ च्या दाखल्यात असे नमूद करण्यात आले आहे की, श्री. दशरथ गंगाराम पाटील हे मौजे मजकूर चिमणे, ता. आजरा येथील कायमचे रहिवाशी असून त्यांचा जन्म दि.२८/९/१९६३ रोजी चिमणे ता. आजरा येथे झाला असे त्यांच्या मागणी अर्जावरुन समजते, परंतु सदरची नोंद ग्राम पंचायत दप्तरी पाहीले असता जन्मनोंद रजिस्टरला दिसून येत नाही. यावरुन असे दिसून येते की, श्री. पाटील यांचा जन्म दिनांक २८ सप्टेंबर, १९६३ ला झाला असल्याचे निर्विवाद सिद्ध होत नाही. कारण श्री. पाटील यांची जन्मतारीख त्यांच्या सेवा पुस्तकात दिनांक २९ ऑगस्ट, १९६३ अशी नमूद असल्याची व सदर जन्म तारीख त्यांच्या शाळा सोडल्याच्या दाखल्यावरुन पडताळून पाहण्यात आली असल्याची नोंद गट विकास अधिकारी, पंचायत समिती वाडा, जि. ठाणे यांच्या स्वाक्षरीने करण्यात आलेली आहे. सेवा पुस्तकातील सदर पृष्ठावर श्री. दशरथ गंगाराम पाटील यांचीही स्वाक्षरी आहे. तसेच श्री. पाटील यांनी त्यांच्या पत्रात क्रमांक ३ येथे जन्म तारखेत बदल करणेसंबंधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे यांना निवेदन सादर केल्याची प्रत उपलब्ध नसल्याचे नमूद केले आहे. यावरुन श्री. पाटील यांनी जिल्हा परिषद सेवेत दिनांक १२ डिसेंबर, १९८४ रोजी रुजू झाल्यानंतर नियमानुसार ५ वर्षाच्या आत त्यांची जन्म तारीख दिनांक २९ ऑगस्ट, १९६३ ऐवजी दिनांक २९ सप्टेंबर, १९६३ अशी दुरुस्त करण्याबाबत निवेदन केले असल्याचे दिसून येत नाही. अथवा असे निवेदन त्यांनी त्यावेळी केले असल्याचेही त्यांनी नमूद केलेले नाही. तसेच दिनांक २६ एप्रिल, २०१७ च्या पत्रासोबत श्री. पाटील यांनी जिल्हा परिषद कोल्हापूर येथे बदली व्हावी याकरिता सादर केलेल्या अर्जाची प्रत सादर केली असून त्यात असे नमूद आहे की श्री. पाटील यांनी बदली साठी संमतीपत्र जोडलेले आहे. तथापि, श्री. पाटील यांनी संमती पत्राची प्रत यासोबत विभागास सादर केलेली नाही.

८) आणि ज्याअर्थी, महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (सेवाप्रवेश) नियम, १९६७ मधील नियम ६(८)(तीन) नुसार जिल्हा परिषद कर्मचाऱ्याच्या विनंतीवरुन एका जिल्हा परिषदेतून दुसऱ्या जिल्हा परिषदेत बदली झाल्यास अशा बदली झालेल्या व्यक्तीची त्या संवर्गातील सेवाज्येष्ठता नंतरच्या जिल्हा परिषदेमध्ये अशी नियुक्ती ज्या तारखेस झाली असेल त्या तारखेपासून राहील अशी तरतूद करण्यात आलेली आहे. यानुसार श्री. पाटील हे जिल्हा परिषद कर्मचारी असल्याने व महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (सेवाप्रवेश) नियम, १९६७ त्यांना लागू असल्या कारणाने तसेच श्री. पाटील हे त्यांच्या विनंतीनुसार जिल्हा परिषद ठाणे येथून जिल्हा परिषद कोल्हापूर येथे दिनांक १ जानेवारी, १९९० रोजी रुजू झाले असल्याचे उपलब्ध कागदपत्रांवरुन दिसून येत असल्याने त्यांचा जिल्हा परिषद कोल्हापूर येथे रुजू दिनांक हाच सेवाज्येष्ठता दिनांक धरणे क्रमप्राप्त आहे. याचाच अर्थ श्री. पाटील यांचा सेवाज्येष्ठता दिनांक हा १ जानेवारी, १९९० असाच राहील कारण या दिवशी ते जिल्हा परिषद कोल्हापूर येथे स्वविनंतीवरुन बदलीने रुजू झालेले आहेत.

९) आणि ज्याअर्थी, संदर्भाधीन क्र. ८ येथील शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडएनजी- १००९/प्र.क्र.१२१/आस्था-४, दिनांक २ जुलै, २००९ अन्वये जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३(पाणी पुरवठा) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंत्यांची दिनांक १.१.२००१ ते

दिनांक १.१.२००४ पर्यंतची अंतिम ज्येष्ठता सूची प्रसिद्ध करण्यात आली होती व त्यामध्ये श्री. दशरथ गंगाराम पाटील यांचा सेवाज्येष्ठता दिनांक १ जानेवारी, १९९० असा दर्शविण्यात आला होता. सदर ज्येष्ठता सूची अंतिमरित्या प्रसिद्ध होण्यापूर्वी याबाबतची अंतरिम ज्येष्ठता सूची दिनांक १९ मार्च, २००८ च्या परिपत्रकान्वये हरकती व सूचना मागविण्यासाठी प्रसिद्ध करण्यात आली असता सदर ज्येष्ठता सूचीबाबत श्री. पाटील यांनी याबाबत कोणतीही हरकत विहीत कालावधीत सादर केलेली नव्हती.

१०) आणि ज्याअर्थी, शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडएनजी-१०१०/प्र.क्र.१३९/आस्था-४, दिनांक १ ऑक्टोबर, २०११ अन्वये जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३(पाणी पुरवठा) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंत्यांची दिनांक १.१.२००९ रोजीची अंतिम ज्येष्ठता सूची प्रसिद्ध करण्यात आली होती आणि त्यामध्ये श्री. दशरथ गंगाराम पाटील यांचा सेवाज्येष्ठता दिनांक १ जानेवारी, १९९० असाच दर्शविण्यात आला होता. सदर ज्येष्ठता सूची अंतिमरित्या प्रसिद्ध होण्यापूर्वी याबाबतची अंतरिम ज्येष्ठता सूची दिनांक ३० मार्च, २०११ च्या परिपत्रकान्वये हरकती व सूचना मागविण्यासाठी प्रसिद्ध करण्यात आली असता श्री. पाटील यांनी याबाबत कोणतीही हरकत विहीत कालावधीत सादर केलेली नव्हती.

११) आणि ज्याअर्थी, शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडएनजी-२०१४/प्र.क्र.६६/आस्था-४, दिनांक १० फेब्रुवारी, २०१५ अन्वये जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३(पाणी पुरवठा) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंत्यांची दिनांक १.१.२०१४ रोजीची अंतिम ज्येष्ठता सूची प्रसिद्ध करण्यात आली होती आणि त्यामध्ये श्री. दशरथ गंगाराम पाटील यांचा सेवाज्येष्ठता दिनांक १ जानेवारी, १९९० असाच दर्शविण्यात आला होता. सदर ज्येष्ठता सूची अंतिमरित्या प्रसिद्ध होण्यापूर्वी याबाबतची अंतरिम ज्येष्ठता सूची दिनांक १० नोव्हेंबर, २०१४ च्या परिपत्रकान्वये हरकती व सूचना मागविण्यासाठी प्रसिद्ध करण्यात आली असता श्री. पाटील यांनी त्याबाबत कोणतीही हरकत विहीत कालावधीत सादर केलेली नव्हती.

१२) त्याअर्थी, उपरोक्त सर्व बाबींचा विचार करता जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा गट क (पाणी पुरवठा) संवर्गातील कनिष्ठ अभियंता यांच्या दिनांक १ जानेवारी, २०१४ रोजीच्या अंतिम ज्येष्ठता सुचीतील श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता यांच्या जन्म तारखेत सेवा पुस्तकात नमूद नोंदीनुसार "२८-०८-१९६३" ऐवजी "२९-०८-१९६३" आणि शैक्षणिक पात्रतेसंबंधी "डीसीआरई" ऐवजी "डीसीई" असा बदल करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. तथापि, श्री. पाटील यांचा दिनांक १० फेब्रुवारी, २०१५ च्या परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या जिल्हा परिषदेतील जिल्हा सेवा, वर्ग-३(पाणी पुरवठा) संवर्गातील कनिष्ठ अभियंता यांच्या दिनांक १ जानेवारी, २०१४ च्या ज्येष्ठता सूचीतील अनुक्रमांक १४८ असाच कायम राहील कारण श्री. पाटील हे स्वविनंतीवरून बदलीने ठाणे जिल्हा परिषदेतून कोल्हापूर जिल्हा परिषदेत दिनांक १ जानेवारी, १९९० रोजी हजर झालेले असल्याने व महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (सेवाप्रवेश) नियम, १९६७ मधील नियम ६(८)(तीन)

नुसार परिणामी त्यांनी पुर्वीची सेवा ज्येष्ठता गमाविली असल्याने त्यांचा ज्येठता दिनांक व नियमित नियुक्तीचा दिनांक १ जानेवारी, १९९० असाच कायम राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५०३१७५४४९३६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Dattatraya Shinde

Digitally signed by Vijay Dattatraya Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fabf0ce38fdf553beb949764920592a97832b6399cb7060200d032e127e455f1, cn=Vijay Dattatraya Shinde
Date: 2017.05.05 16:35:17 +05'30'

**(विजय शिंदे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक,
२. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे,
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर,
४. श्री. दशरथ गंगाराम पाटील, शाखा अभियंता, जिल्हा परिषद, कोल्हापूर (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांच्यामार्फत),
५. कार्यासन क्रमांक आस्था-१०, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
६. निवड नस्ती, का.क्र. आस्था-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.